**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) कल्याण अंबरुषी उकिरडे,उपशिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२५/प्र.क्र.४४/टीएनटी-६**
**File No.:MSC-16/3/2025-MSC-(TNT-6)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २०/०६/२०२५

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) तालुका आरोग्य अधिकारी,पंचायत समिती बार्शी जि. सोलापूर यांचे पत्र क्र. ताआअका/आरोग्य/आस्था-१/७६२/२०२१, दि.२२/०६/२०२१
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. सोलापूर यांचे पत्र क्र.जिपसो/शिक्षण(प्राथ)/प्राआ-७/८३३/२०२४, दि.३०/०९/२०२४
५) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/ संकीर्ण/७२२०/२०२४, दिनांक ०५/११/२०२४

ज्ञापन :-

कै. (श्री.) कल्याण अंबरुषी उकिरडे,उपशिक्षक, जिल्हा परिषद प्राथ. शाळा, भालगाव ता.बार्शी जि.सोलापूर यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०९/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) उकिरडे, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (५) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. सोलापूर यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. कै. (श्री.) उकिरडे यांच्या पत्नी श्रीमती बिनादेवी कल्याण उकिरडे यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दिनांक निरंक रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे. सबब, कै. (श्री.) उकिरडे यांच्या वारसास वित्त विभागाच्या दि.२९/०५/२०२० च्या शासन निर्णयान्वये रु. ५० लक्ष रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात कवच मिळावे असा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांनी सादर केला आहे.

४. कै. (श्री.) कल्याण अंबरुषी उकिरडे,उपशिक्षक, जिल्हा परिषद प्राथ. शाळा, भालगाव ता.बार्शी जि.सोलापूर येथे दिनांक ३०/०५/२०१८ पासून कार्यरत होते.

५. गटविकास अधिकारी (वर्ग-१) पंचायत समिती बार्शी यांचेकडील दिनांक ०६/१२/२०२० रोजीच्या आदेशान्वये कै. (श्री.) उकिरडे यांची कोविड-१९ संबंधित माझे गाव कोरोना मुक्त गाव या अभियांना अंतर्गत सहवासितांचा शोध घेण्यासाठी व सर्वेक्षण करण्यासाठी ग्रामस्तरीय पथक भालगाव येथे दिनांक ०६/१२/२०२० पासून येथे नियुक्ती करण्यात आली होती. सदर आदेशाच्या अनुषंगाने कै.(श्री.) उकिरडे हे दिनांक ०६/१२/२०२० ते दिनांक २२/०४/२०२१ पर्यंत कोविड-१९ संबंधित माझे गाव कोरोना मुक्त गाव या अभियांना अंतर्गत सहवासितांचा शोध घेण्यासाठी व सर्वेक्षण करण्यासाठी ग्रामस्तरीय पथक भालगाव येथे कार्यरत असल्याबाबत तालुका आरोग्य अधिकारी, पंचायत समिती बार्शी यांनी प्रमाणित केले आहे.

६. कै.(श्री.) उकिरडे यांची दि.२७/०४/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे दिसून येते.

७. कै.(श्री.) उकिरडे गटविकास अधिकारी (वर्ग-१) पंचायत समिती बार्शी यांचेकडील दिनांक ०६/१२/२०२० रोजीच्या आदेशान्वये कै. (श्री.) उकिरडे यांची कोविड-१९ संबंधित माझे गाव कोरोना मुक्त गाव या अभियांना अंतर्गत सहवासितांचा शोध घेण्यासाठी व सर्वेक्षण करण्यासाठी ग्रामस्तरीय पथक भालगाव येथे दिनांक ०६/१२/२०२० पासून कर्तव्यावर कार्यरत होते. सदरचे कर्तव्य बजावत असताना दिनांक ०९/०५/२०२१ रोजी कोरोना आजारामुळे मृत्यू झाला आहे. त्यानुसार कै.(श्री.) उकिरडे हे इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर असल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी प्रमाणित केले आहे.

८. कै.(श्री.) उकिरडे यांचेवर दिनांक ०१/०५/२०२१ पासून ते दिनांक ०९/०५/२०२१ या कालावधीत सोमाणी हॉस्पीटल श्री क्रिटिकल केअर सेंटर,बार्शी येथे कोव्हिड-१९ उपचार करण्यात आले. दिनांक ०९/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ आजाराने मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे एमबीबीएस (एमडी) , सोमाणी हॉस्पीटल श्री क्रिटिकल केअर सेंटर,बार्शी यांनी प्रमाणित केले आहे.

९. कै.(श्री.)उकिरडे यांचा दिनांक ०९/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र निबंधक (जन्म व मृत्यु),नगरपालिका,बार्शी यांचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

१०. मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर,बार्शी यांनी कै. (श्री.) उकिरडे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) बिनादेवी कल्याण उकिरडे (२) सुरज कल्याण@कल्याणराव उकिरडे (३) सायली कल्याण@कल्याणराव उकिरडे (४) साखरबाई अंबरुषी उकिरडे यांना घोषित केले आहे.

११. कै.(श्री.)कल्याण अंबरुषी उकिरडे,उपशिक्षक, जिल्हा परिषद प्राथ. शाळा, भालगाव ता.बार्शी जि.सोलापूर यांना २२०२ ०१७३-३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, सोलापूर यांनी प्रमाणित केले आहे.

१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर व एमबीबीएस (एमडी),सोमाणी हॉस्पीटल श्री क्रिटिकल केअर सेंटर,बार्शी यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर,बार्शी यांनी कै. (श्री.) उकिरडे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) बिनादेवी कल्याण उकिरडे (२) सुरज कल्याण@कल्याणराव उकिरडे (३) सायली कल्याण@कल्याणराव उकिरडे (४) साखरबाई अंबरुषी उकिरडे यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१३. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र.६४९/व्यय-५ दि.११/०६/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

१४. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्ष प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१५. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०६२०११४९१३६४२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.06.20 11:50:47 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक,पुणे विभाग, पुणे
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), सोलापूर

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती बिनादेवी कल्याण उकिरडे, ता. बार्शी जि.सोलापूर पीन-४१३४०१
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.४४/२०२५)